**शिवछत्रपती राज्य क्रीडा पुरस्कार व अन्य क्रीडा पुरस्कार सुधारीत नियमावली.**

# महाराष्ट्र शासन
## शालेय शिक्षण व क्रीडा विभाग
## शासन शुद्धिपत्रक क्रमांकः शिछपु २०१८/प्र.क्र.१२७/१८/क्रीयुसे-२

मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२,
तारीख: २४ ऑक्टोबर, २०१८

**वाचा :**

(१) शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, क्रमांक शिछपु २०१६/प्र.क्र.२०१/१६/ क्रीयुसे-२; दि. १६.१०.२०१७.
(२) शासन शुध्दिपत्रक, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, क्रमांक- शिछपु २०१६/ प्र.क्र.२०१/ १६/ क्रीयुसे-२;, दिनांक ०८.१२.२०१७.

**प्रस्तावना :**

महाराष्ट्र राज्यातील सर्वोत्कृष्ट क्रीडापटूंना शिवछत्रपती राज्य क्रीडा पुरस्कार देण्याबाबतच्या नियमावलीमध्ये सुधारणा करुन उपरोक्त दिनांक १६.१०.२०१७ च्या शासन निर्णयान्वये सुधारित नियमावली विहित करण्यात आलेली आहे. गत वर्षी पुरस्कारासाठी प्राप्त झालेल्या अर्जाची छाननी करताना उद्भवलेल्या अडचणी विचारात घेवून सदर शासन निर्ण्यामध्ये सुधारणा करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शुद्धिपत्रक :**

शासन निर्णय दि.१६.१०.२०१७ मधिल परीशिष्ट “अ ” मधिल नियम क्र.२ मध्ये पुढील नियम समाविष्ट करण्यात येत आहेत:

i. नियम क्र.१३ - राज्य निवड समितीने शासनास पुरस्कारार्थीची अंतिम शिफारस केल्या नंतर संबंधित जिल्हा क्रीडा अधिकारी यांनी संबंधिता खेळाडू/मार्गदर्शक यांचा चारित्र्य पडताळणी अहवाल पोलीस विभागाकडून प्राप्त करुन घेऊन क्रीडा व युवक सेवा संचालनालयास सादर करावा.
ii. नियम क्र. १४ - सदर पुरस्कारासाठी शिफारस करताना अर्जदारांची दि. १ जूलै ते ३० जून असे वर्ष ग्राहय धरुन कामगिरी विचारात येईल.
iii. नियम क्र. १५ - शिवछत्रपती राज्य क्रीडा पुरस्कार व अन्य पुरस्काराबाबत अंतिम निर्णय घेण्याचे अधिकार शासनास राहतील.

iv. नियम क्र.१६ - संदर्भ क्र.०१ च्या शासन निर्णयामधील सर्व पुरस्कारांसाठी पात्र खेळांपैकी एखाद्या खेळाचा पुरस्कार, अर्ज प्राप्त न झाल्याने अथवा पात्र उमेदवार न मिळाल्यामुळे पुरस्कार न देण्याचा निर्णय घेण्यात आला असेल असेल तर तो पुरस्कार पात्र खेळाच्या अन्य उप प्रकारसाठी पुरस्काराची शिफारस करण्याचे अधिकार राज्य निवड समितीस राहतील. (अर्थसंकल्पित निधीच्या मर्यादेत)

२. परीशिष्ट "अ " मधिल नियम क्र.४ (१) मध्ये पुढील नियम समाविष्ट करण्यात येत आहेत:

संघटक/कार्यकर्ते यांना ऑनलाईन अर्ज सादर करण्याची तारीख हि दि. २५ ऑक्टोबर ते दि. १५ नोव्हेंबर २०१८ अशी ठेवण्यात यावी. दि. २० नोव्हेंबर २०१८ पर्यंत संघटक/कार्यकर्ते यांनी ऑनलाईन अर्जांची एक प्रत स्वसाक्षांकित करुन संबंधित जिल्हा क्रीडा अधिकारी यांचेकडे सादर करावे. दि. २१ ते ३० नोव्हेंबर २०१८ या कालावधीत जिल्हा क्रीडा अधिकारी यांनी संबंधित अर्जदाराने सादर केलेल्या कागदपत्रानुसार त्या त्या ठिकाणी जाऊन तपासणी व पडताळणी करावी.

३. परिशिष्ट अ-३ मधिल नियम ६, "संबंधित खेळाडूची पुरस्कार वर्षातील ३० जून रोजी संपणा-या वर्षासह लगतपूर्ण ५ वर्षातील आंतरररष्ट्रीय , राष्ट्रीय , वरीष्ठ राज्य अजिंक्यपद स्पर्धेमधिल कामगिरी पुरस्कारासाठी विचारात घेण्यात येईल. उपरोक्त पाच वर्षांपैकी कोणत्याही तीन वर्षात संबंधित खेळाडूने अधिकृत राज्य संघातर्फे संबंधित खेळाच्या अधिकृत राष्ट्रीय फेडरेशन मार्फत आयोजित वरिष्ठ (सिनिअर) राष्ट्रीयस्तर स्पर्धेमध्ये सहभागी होवून किमान एका वर्षात पदक संपादित केलेले नसेल तर अशा खेळाडूंचा गुणांकना करिता विचार केला जाणार नाही." या ऐवजी

**"संबंधित खेळाडूची पुरस्कार वर्षातील ३० जून रोजी संपणा-या वर्षासह लगतपूर्ण ५ वर्षातील आंतरराष्ट्रीय, राष्ट्रीय, वरीष्ठ राज्य अजिंक्यपद स्पर्धेमधिल कामगिरी पुरस्कारासाठी विचारात घेण्यात येईल. पाच वर्षांपैकी कोणत्याही तीन वर्षात संबंधित खेळाडूने अधिकृत राज्य संघातर्फे संबंधित खेळाच्या अधिकृत राष्ट्रीय फेडरेशन मार्फत आयोजित वरिष्ठ (सिनिअर) राष्ट्रीयस्तर स्पर्धेमध्ये /राष्ट्रीय क्रीडा स्पर्धा (नॅशनल गेम्स) मध्ये महाराष्ट्र प्रातिनिधिक संघातून सहभागी होवून किमान एका वर्षात पदक (प्राविण्य) संपादित केले आहे, अशा खेळाडूंचा गुणांकना करिता विचार करण्यात येईल. एकाच वर्षामध्ये वरिष्ठ राष्ट्रीय अजिंक्यपद स्पर्धा व राष्ट्रीय स्पर्धा (नॅशनल गेम्स्) आयोजित झालेल्या असतील तर त्या दोन स्वतंत्र स्पर्धा गणण्यात येतील."** असे वाचावे.

४. शिवछत्रपती राज्य क्रीडा पुरस्कार खेळाडू परिशिष्ट अ-३.४ मधिल बाब ९ मध्ये अंतर्भूत असलेल्या स्पर्धा समवेत "अखिल भारतीय नागरी सेवा स्पर्धा " या स्पर्धेचा समावेश करण्यात येत आहे.

५. परिशिष्ट अ-४ मधिल नियम ५ (१) "पात्र पुरस्कारार्थींचा क्रम ठरविताना त्यांच्या कामगिरीचे मुल्यमापन (किमान ५ वर्षे सातत्यपुर्ण कामगिरी, कौशल्य, विक्रम, साहसाची तीव्रता, घेतलेली जोखीम, काठीण्य पातळी, नैसर्गिक प्रतिकुलता, प्रतिकुल परिस्थिती यासारखी दृष्य परिणामे तसेच संबंधित व इतर साहसी क्रीडा प्रकारातील योगदान, प्रशिक्षण व व्यवस्थापन विचारात घेतली जातील)." या ऐवजी

**" पात्र पुरस्कारासाठी खेळाडूच्या कामगिरीचे मुल्यमापन करताना पुरस्कार वर्षाच्या लगतपुर्व ५ वर्षाची कामगिरी विचारात घेण्यात येईल. यामध्ये कौशल्य, विक्रम, साहसाची तीव्रता, घेतलेली जोखीम, काठीण्य पातळी, नैसर्गिक प्रतिकुलता, प्रतिकुल परिस्थिती यासारखी दृष्य परिणामे तसेच संबंधित व इतर साहसी क्रीडा प्रकारातील योगदान, प्रशिक्षण व व्यवस्थापन विचारात घेतली जातील."** असे वाचावे.

६. परिशिष्ट अ-४ मधिल नियम ७ (१) (अ) "गिर्यारोहण केलेल्या शिखरांची उंची ८००० मी. पेक्षा अधिक असावी." या ऐवजी " **गिर्यारोहण केलेल्या शिखरांची उंची ६००० मी. पेक्षा अधिक असावी व सर्वोच्च उंची सर केलेल्या व्यक्तीस प्राधान्य देण्यात येईल.**" असे वाचावे.

७. परिशिष्ट अ-५ मधिल नियम ५ बाब क्र.२ मध्ये नमूद 'एशियन पॅरा गेम्स / कॉमनवेल्थ पॅरा गेम्स मध्ये सहभागासाठी ८ ऐवजी **१२** गुण देण्यात येतील.'

८. परीशिष्ट " अ-५ " एकलव्य राज्य क्रीडा पुरस्कार (दिव्यांग खेळाडू) नियम २०१७ मधिल नियम क्र. ६ (२) मध्ये एकलव्य पुरस्कारासाठी नमूद केलेल्या १९ खेळांमध्ये पुढील खेळांचा समावेश करण्यात येत आहे:-

२०. पॅराकॅनॉई,
२१. पॅराट्रायथलॉन
२२. व्हील चेअर रग्बी
२३. बॅडमिंटन
२४. बुध्दीबळ
२५. क्रीकेट

९. परीशिष्ट " अ-६ " संघटक/कार्यकर्ते पुरस्कार नियम २०१७ मधील नियम क्र. ३ (५)," क्रीडा संघटक/ कार्यकर्ते यांनी एक वा अधिक अधिकृत खेळाचा प्रचार व प्रसारासाठी पुरस्कार वर्षातील ३० जून रोजी संपणा-या वर्षासह लगतपूर्व १५ वर्षात केलेल्या कामाचे मूल्यमापन खालील तीन प्रकारान्वये करण्यात येईल." या ऐवजी, **"क्रीडा संघटक/ कार्यकर्ते यांनी एक वा अधिक अधिकृत खेळाचा प्रचार व प्रसारासाठी पुरस्कार वर्षातील ३० जून रोजी संपणा-या वर्षासह लगतपूर्व १० वर्षात केलेल्या कामाचे मूल्यमापन खालील तीन प्रकारान्वये करण्यात येईल." असे वाचावे.**

१०. परीशिष्ट " अ-६ " संघटक/कार्यकर्ते पुरस्कार नियम २०१७ मधिल नियम क्र. ३ मध्ये पुढील नियम समाविष्ट करण्यात येत आहेत:

नियम क्र.१० - एका विभागामधुन जर दोन किंवा अधिक संघटक/कार्यकर्ते यांना गुणांकनामध्ये समान गुण मिळालेले असतील तर अशा वेळी वयाने जेष्ठ असलेल्या व्यक्तीस प्राधान्य दिले जाईल. जर वयामध्ये सुध्दा समानता असेल तर अशा वेळी अ), ब) व क) मधील आंतरराष्ट्रीय स्पर्धांचे आयोजन करणे, निवडसमिती मधील कामगिरी व क्रीडा विषयक लेखन या तीन बाबी मिळून सर्वाधिक गुण प्राप्त करणा-या व्यक्तीस प्राधान्य दिले जाईल.

नियम क्र.११ - संघटकाने क्रीडा मंडळ अथवा एकविध खेळ संघटना स्थापन केलेली असेल तर त्या मंडळाच्या अथवा एकविध खेळ संघटनेच्या त्यावेळेच्या कागदपत्रांमध्ये (धर्मदाय आयुक्त यांनी मान्य केलेली घटना किंवा पदाधिकारी यादी मध्ये) संबंधितांचे नांव नमूद केलेले असेल तरच गुणांकनासाठी विचार केला जाईल. तसेच पुर्वीचे व चालू असलेले कागदपत्रे (धर्मदाय आयुक्तांचा चेंज रिपोर्टसह) सादर करावेत.

११. शिवछत्रपती राज्य क्रीडा पुरस्कार (संघटक/ कार्यकर्ते) या साठी सुधारित परिशिष्ट अ ६.१ ते अ ६.३ प्रमाणे सुधारीत करण्यात येत आहे.

१२. परिशिष्ट अ-७ मधील नियम ३ बाब क्र.१ जिल्हा क्रीडा पुरस्कारामध्ये

अ) प्रमाणपत्र रुपये २५०/- प्रत्येकी (रु. दोनशे पन्नास फक्त)
(ब) स्मृतिचिन्ह रुपये १,५००/- प्रत्येकी (रु. एक हजार पाचशे फक्त) असे दर निश्चित करण्यात येत आहेत.

१३. परिशिष्ट अ-७ मधिल नियम ६ (तीन) मधील (v) बाब क्र.२ , " (३) जागतिक अजिंक्यपद क्रीडा स्पर्धा (सर्व गट), (४) जागतिक चषक क्रीडा स्पर्धा (सर्व गट), (५) आशियाई अजिंक्यपद स्पर्धा (सर्व गट), (६) राष्ट्रकुल अजिंक्यपद स्पर्धा (सर्व गट)" या ऐवजी

**" (३) जागतिक अजिंक्यपद क्रीडा स्पर्धा (वरीष्ठ गट), (४) जागतिक चषक क्रीडा स्पर्धा (वरीष्ठ गट), (५) आशियाई अजिंक्यपद स्पर्धा (वरीष्ठ गट), (६) राष्ट्रकुल अजिंक्यपद स्पर्धा (वरीष्ठ गट) असे वाचावे.**

१४. परिशिष्ट अ-७ जिल्हा क्रीडा पुरस्कारामधील नियम क्र.६ (तीन) मधील मुद्दा क्रमांक viii येथे दिव्यांग खेळाडूंसाठी पात्रतेचे निकष, पात्र क्रीडा व खेळ प्रकार हे खालील प्रमाणे गुणांकन राहील:-

**जिल्हा क्रीडा पुरस्कार दिव्यांग खेळाडूंच्या मूल्यांकनासाठी गुणकोष्टक**

| अ. क्र | क्रीडा स्पर्धेचा स्तर | स्पर्धेतील खेळाडूची कामगिरी | | | |
|---|---|---|---|---|---|
| | | पहिला क्रमांक | दुसरा क्रमांक | तिसरा क्रमांक | सहभाग |
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ |
| १ | ज्यूनि. वर्ल्ड पॅरा अजिंक्यपद स्पर्धा<br>आशियायी पॅरा अजिंक्यपद स्पर्धा/(कनिष्ठ गट)<br>कॉमनवेल्थ पॅरा अजिंक्यपद स्पर्धा (कनिष्ठ गट) | थेट पुरस्कार | थेट पुरस्कार | थेट पुरस्कार | थेट पुरस्कार |
| २ | वरिष्ठ पॅरा राष्ट्रीय अजिंक्यपद स्पर्धा | ०९ | ०८ | ०७ | ०६ |
| ३ | कनिष्ठ पॅरा राष्ट्रीय अजिंक्यपद स्पर्धा/ वरिष्ठ पॅरा राज्य अजिंक्यपद स्पर्धा | ०८ | ०७ | ०६ | ०५ |

| अ. क्र | क्रीडा स्पर्धेचा स्तर | स्पर्धेतील खेळाडूची कामगिरी | | | |
|---|---|---|---|---|---|
| | | पहिला क्रमांक | दुसरा क्रमांक | तिसरा क्रमांक | सहभाग |
| ४ | कनिष्ठ पॅरा राज्य अजिंक्यपद स्पर्धा | ०७ | ०६ | ०५ | ०४ |
| ५ | कनिष्ठ पॅरावरिष्ठ पॅरा जिल्हा अजिंक्यपद स्पर्धा , | ०६ | ०५ | ०४ | ०३ |

१४. शिवछत्रपती राज्य क्रीडा पुरस्कार (संघटक/ कार्यकर्ते) या साठी सुधारित परिशिष्ट अ ६.१ ते अ ६.३ प्रमाणे सुधारीत करण्यात येत आहे.

१५. सदर शासन शुद्धिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेताक २०१८१०२६१७०४०३२६२१ असा आहे. हे शुद्धिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Rajendra Shankarrao Pawar

Digitally signed by Rajendra Shankarrao Pawar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=School Education and Sports Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=679184b88f7019ef64ad6ddc2495ca280267c0d4755ce63fa70c45cf755d9373, cn=Rajendra Shankarrao Pawar
Date: 2018.10.26 17:09:46 +05'30'

**( राजेंद्र पवार )**

**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१.मा.राज्यपाल तथा अध्यक्ष, आंतरविद्यापीठ क्रीडा महोत्सव आयोजन समिती, मुंबई.
२.मा.मंत्री, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
३.मा.विरोधी पक्षनेता (विधानसभा / विधानपरिषद) यांचे स्वीय सहायक, मुंबई.
४. सर्व विधानसभा / विधानपरिषद सदस्य यांचे स्वीय सहायक.
५. प्रधान सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
६. आयुक्त, क्रीडा व युवक सेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे,
७. महालेखापाल (लेखा अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१ - मुंबई/महाराष्ट्र-२ नागपूर,
८. महालेखापाल (लेखा), महाराष्ट्र-१ - मुंबई/महाराष्ट्र-२ नागपूर
९. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई. (क्रीडा संचालनालयामार्फत)
१०. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी (क्रीडा संचालनालयामार्फत)
११. वरिष्ठ कोषागार अधिकारी, पुणे. (क्रीडा संचालनालयामार्फत)
१२. लेखाधिकारी, क्रीडा व युवक सेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे, (क्रीडा संचालनालयामार्फत)
१३. सर्व उपसंचालक व जिल्हा क्रीडा अधिकारी (क्रीडा संचालनालयामार्फत),
१४. अवर सचिव (क्रियुसे-३)
१५. कक्ष अधिकारी (क्रीयुसे-१)
१६. निवड नस्ती (क्रीयुसे-२).

# परिशिष्ट-अ-६.१

## विकासात्मक कार्य

| अ.क्र. | कार्याचा तपशिल | वर्ष | मैदान/व्यायामशाळा उभारणी केलेल्या संस्थेचे / मंडळाचे / संघटनेचे नांव व पत्ता | संबंधित संस्थेकडून अर्जदारास प्राप्त झालेले प्रमाणपत्र/ पत्र सोबत जोडले आहे/नाही | अर्जदाराचे संस्था / मंडळ/ संघटनेतील पद नमूद करावे व सोबत पुरावा जोडावा | अर्जासोबत जोडलेल्या पुराव्याचा पृष्ठ क्रमांक |
|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ |
| १ | क्रीडांगण तयार करणे | | | | | |
| २ | व्यायामशाळा बांधणे | | | | | |

| अ.क्र. | कार्याचा तपशिल | वर्ष | खेळ प्रकार | स्थापना केलेल्या संस्थेचे / मंडळाचे / संघटनेचे नांव व पत्ता | क्रीडा मंडळाचे नोंदणी प्रमाणपत्र, घटना (जुनी व चालू) व स्थापनेचा दिनांक | स्थापन केलेल्या मंडळाचे किती खेळाडू राष्ट्रीय व आंतरराष्ट्रीय पातळीवर उल्लेखनीय कामगिरी केलेली आहे त्याची सविस्तर माहिती सोबत जोडली आहे/नाही | संबंधित संस्थेकडून अर्जदारस प्राप्त झालेले प्रमाणपत्र/ पत्र सोबत जोडले आहे/नाही | अर्जदाराचे संस्था / मंडळ/ संघटनेतील पद नमूद करावे व सोबत पुरावा जोडावा | अर्जासोबत जोडलेल्या पुराव्याचा पृष्ठ क्रमांक |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ | ९ | १० |
| ३ | क्रीडा मंडळाची स्थापना करणे | | | | | | | | |

(संघटक/कार्यकर्ता यांनी क्रीडा मंडळ अथवा एकविध खेळ संघटना स्थापन केलेली असेल तर त्या मंडळाच्या अथवा एकविध खेळ संघटनेच्या त्यावेळेच्या कागदपत्रांमध्ये (धर्मदाय आयुक्त यांनी मान्य केलेली घटना किंवा पदाधिकारी यादी मध्ये) संबंधितांचे नांव नमूद केलेले असेल तरच गुणांकनासाठी विचार केला जाईल. तसेच पुर्वीचे व चालू असलेले कागदपत्रे (धर्मदाय आयुक्तांचा चेंज रिपोर्टसह) सादर करावेत.)

## विकासात्मक कार्य प्रमाणपत्राचा नमुना

मी श्री./श्रीमती ................................................................... खालील सही करणार या पत्राद्वारे प्रमाणित करुन देतो की, श्री./श्रीमती. ........................................................... यांनी शिवछत्रपती राज्य क्रीडा पुरस्कार (संघटक/कार्यकर्ते), जिजामाता राज्य क्रीडा पुरस्कारासाठी अर्ज केलेला असून त्यांनी आमच्या संस्थेच्या मैदानामध्ये/जागेमध्ये ............................ या खेळाची क्रीडांगणे तयार करण्यास/व्यायामशाळा बांधणेस / क्रीडा मंडळाची स्थापना करणेस मोलाचे सहकार्य कामगिरी केले आहे. सदरचे क्रीडांगण/ व्यायामशाळा/क्रीडा मंडळ सदय:स्थितीत कार्यरत आहे. श्री./श्रीमती ....................................................... यांच्या सहकार्यामुळेच व त्यांनी केलेल्या ................................. मदतीमुळेच क्रीडांगण/व्यायामशाळा/क्रीडा मंडळ चालू झालेले आहे. अश्या प्रकारचे प्रमाणपत्र मी यापुर्वी कुणालाही दिलेले नाही. वरिल सर्व माहिती सत्य असून मी प्रतिज्ञापत्रावर लिहून देत आहे. यामध्ये जर खोटी माहिती आढळून आल्यास माझेवर कायदेशीर कार्यवाही होईल याची मला जाणीव आहे.

दिनांक - संस्था प्रमुखाची स्वाक्षरी -
ठिकाण - संस्था प्रमुखाचे संपुर्ण नांव -

## जिल्हा क्रीडा अधिकारी यांनी दयावयाच्या प्रमाणपत्राचा नमुना

उपरोक्त संस्था प्रमुखांनी दिलेल्या विकासात्मक कार्य प्रमाणपत्राबाबत मी स्वत: प्रत्यक्ष पाहणी व पडताळणी केलेली असून श्री. / श्रीमती ............................................. यांनी शिवछत्रपती राज्य क्रीडा पुरस्कार (संघटक/कार्यकर्ते), जिजामाता राज्य क्रीडा पुरस्कारासाठी अर्ज केलेला असून त्यांनी ........................................................................ या संस्थेच्या मैदानामध्ये/जागेमध्ये ........................... या खेळाची क्रीडांगणे तयार करण्यास/व्यायामशाळा बांधणेस / क्रीडा मंडळाची स्थापना करणेस मोलाचे सहकार्य केलेले असल्याचे दिसून आलेले आहे. सदरचे क्रीडांगण/ व्यायामशाळा/क्रीडा मंडळ सदय:स्थितीत कार्यरत आहे. श्री./श्रीमती ....................................................... यांच्या सहकार्यामुळेच व त्यांनी केलेल्या ................................. मदतीमुळेच क्रीडांगण/ व्यायामशाळा/क्रीडा मंडळ चालू झालेले आहे. व सद्य:स्थितीत चालू असल्याची खात्री केलेली आहे.

दिनांक - जिल्हा क्रीडा अधिकारी यांची स्वाक्षरी -
ठिकाण - शिक्का

# परिशिष्ट-अ-६.२

## संघटनात्मक कार्य

| अ. क्र. | कार्याचा तपशिल | स्पर्धा आयोजनाचे वर्ष | खेळ प्रकार | स्पर्धेचा कालावधी | स्पर्धा आयोजनाचे स्थळ (मैदानाचे / संस्थेचे नांव व पत्ता ) | अर्जदाराचे स्पर्धा आयोजन समिती मधील पद व त्याचे पुरावे सोबत जोडावे | अर्जदारास प्राप्त झालेले स्पर्धा आयोजन समितीचे पत्र/ प्रमाणपत्र सोबत जोडले आहे/नाही | स्पर्धेमध्ये सहभागी झालेल्या खेळाडूंची संख्या व त्याचे पुरावे सोबत जोडले आहे/नाही | अन्य माहिती, कागदपत्रे असल्यास ती स्वतंत्रपणे पुरावे म्हणून जोडले आहे/नाही | अर्जासोबत जोडलेल्या पुराव्याचा पृष्ठ क्रमांक |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ | ९ | १० | ११ |
| १ | **अधिकृत खेळाच्या क्रीडा स्पर्धा भरविणे.** | | | | | | | | | |
| | जिल्हास्तर | | | | | | | | | |
| | विभागीय स्तर | | | | | | | | | |
| | राज्यस्तर | | | | | | | | | |
| | आंतरविद्यापीठ स्तर | | | | | | | | | |
| | राष्ट्रीय स्तर | | | | | | | | | |
| | आंतरराष्ट्रीय स्तर | | | | | | | | | |
| २. | **क्रीडा प्रशिक्षण शिबीराचे आयोजन करणे** | | | | | | | | | |

| अ. क्र. | कार्याचा तपशिल | स्पर्धा आयोजनाचे वर्ष | खेळ प्रकार | स्पर्धेचा कालावधी | स्पर्धेचे स्थळ (मैदानाचे /संस्थेचे नांव व पत्ता) | अर्जदाराची स्पर्धामधील नियुक्ती व त्याचे पुरावे सोबत जोडले आहे/नाही | स्पर्धेचा स्तर (जिल्हास्तर / राज्यस्तर/ राष्ट्रीयस्तर/ आंतरराष्ट्रीयस्तर) | अर्जदारास प्राप्त झालेले स्पर्धा आयोजन समितीचे पत्र/ प्रमाणपत्र जोडले आहे/नाही | अर्जासोबत जोडलेल्या पुराव्याचा पृष्ठ क्रमांक |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ | ९ | १० |
| ३ | राज्य / राष्ट्रीय/ आंतरराष्ट्रीय अजिंक्यपद स्पर्धांच्या निवड समितीचे सदस्य/ पंच/ सरपंच/ सामानाधिकारी/ वेळाधिकारी/ गुणलेखक व व्यवस्थापक म्हणून केलेली कामगिरी | | | | | | | | |

| अ. क्र. | कार्याचा तपशिल | प्रायोजकत्व मिळवून देणे | क्रीडा साहित्य देणे | क्रीडा गणवेष देणे | क्रीडा सुविधा उपलब्ध करुन देणे | आर्थीक सहाय्य करणे | इतर |
|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ |
| ४ | खेळाडू संख्या | | | | | | |
| या बाबत खालील नमुद केलेल्या विहीत नमुन्यातील खेळाडूचे प्रतिज्ञापत्र जोडणे आवश्यक आहे. | | | | | | | |

## खेळाडूच्या प्रतिज्ञापत्राचा नमुना

मी राष्ट्रीय/आंतरराष्ट्रीय स्तरावरील खेळाडू असून ............................ या खेळामध्ये खालील नमूद राष्ट्रीय/आंतरराष्ट्रीय स्पर्धेमध्ये सहभाग/प्राविण्य प्राप्त केले आहे.

| अ.क्र. | स्पर्धेचे नांव | वर्ष | आयोजन संघटना | प्राविण्य/सहभाग |
|---|---|---|---|---|
| १ | | | | |
| २ | | | | |
| ३ | | | | |
| ४ | | | | |
| ५ | | | | |
| ६ | | | | |
| ७ | | | | |

वर नमूद स्पर्धेमध्ये सहभाग घेऊन संपादन केलेले यश हे मला श्री./श्रीमती ...................................................... यांच्या सहकार्यामुळेच व त्यांनी केलेल्या प्रायोजकत्व मिळवून देणे,/क्रीडा साहित्य देणे/क्रीडा गणवेश देणे/क्रीडा सुविधा उपलब्ध करुन देणे/आर्थिक सहाय्यक करणे/इ. मदतीमुळेच प्राप्त झालेले आहे. अशा प्रकारचे प्रमाणपत्र मी यापुर्वी कुणालाही दिलेले नाही. वरिल सर्व माहिती मान्य असून मी प्रतिज्ञापत्रावर लिहून देत आहे. सदर माहिती खोटी असल्याचे आढळून आल्यास मी कायदेशीर कार्यवाहीस पात्र होईल याची मला जाणीव आहे.

दिनांक -
ठिकाण -

खेळाडूची स्वाक्षरी -
खेळाडूचे संपुर्ण नांव -

# परिशिष्ट-अ-६.३

## क्रीडा प्रचार व प्रसार

| अ. क्र. | कार्याचा तपशिल | वर्ष | विषय | कालावधी | स्थळ (मैदानाचे /संस्थेचे नांव व पत्ता) | खेळ प्रकार | जिल्हा / राज्य/ राष्ट्रीय/आंतरराष्ट्रीय स्तर | लाभार्थी सहभागी संख्या | अर्जदारास आयोजकांकडून प्राप्त झालेले पत्र/ प्रमाणपत्र पुरावा म्हणून जोडले आहे/नाही | अर्जासोबत जोडलेल्या पुराव्याचा पृष्ठ क्रमांक |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ | ९ | १० | ११ |
| १ | चर्चासत्र आयोजन करणे | | | | | | | | | |
| २ | परिसंवाद आयोजन करणे | | | | | | | | | |
| ३ | प्रात्यक्षिके | | | | | | | | | |

| अ. क्र. | कार्याचा तपशिल | वर्ष | पुस्तकाचे नाव | प्रकाशनाचे दिनांक | प्रकाशनाचे नांव | खेळ प्रकार | जिल्हा | प्रकाशकाचे पत्र/ प्रमाणपत्र | अर्जासोबत जोडलेल्या पुराव्याचा पृष्ठ क्रमांक |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ | ९ | १० |
| ४ | पुस्तक प्रकाशन | | | | | | | | |
| ५ | मासिक | | | | | | | | |

| अ.क्र. | कार्याचा तपशिल | वर्ष | बातमी प्रसिध्द झालेल्या वृत्तपत्राचे नाव व दिनांक | विषय | वृत्तपत्रातील बातमी | जिल्हा | अर्जासोबत जोडलेल्या पुराव्याचा पृष्ठ क्रमांक |
|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ |
| ६ | वर्तमानपत्रे | | | | | | |

| अ.क्र. | कार्याचा तपशिल | वर्ष | आकाशवाणीवरुन बातमी प्रसारणाचा दिनांक व वेळ | विषय | आकाशवाणीचे पत्र | जिल्हा | अर्जासोबत जोडलेल्या पुराव्याचा पृष्ठ क्रमांक |
|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ |
| ७ | आकाशवाणी | | | | | | |

| अ.क्र. | कार्याचा तपशिल | वर्ष | दूरदर्शनवरुन बातमी प्रसारणाचा दिनांक व वेळ | विषय | दूरदर्शनचे पत्र | जिल्हा | अर्जासोबत जोडलेल्या पुराव्याचा पृष्ठ क्रमांक |
|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ |
| ८ | दूरदर्शन | | | | | | |

| अ.क्र. | कार्याचा तपशिल | वर्ष | चॅनलवरुन बातमी प्रसारणाचा दिनांक व वेळ | विषय | चॅनेलचे नांव व पत्र | जिल्हा | अर्जासोबत जोडलेल्या पुराव्याचा पृष्ठ क्रमांक |
| --- | --- | --- | --- | --- | --- | --- | --- |
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ |
| ९ | इतर चॅनेल्स | | | | | | |
| | १. | | | | | | |
| | २. | | | | | | |
| | ३. | | | | | | |